**कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२१/२१६/प्र.क्र.७८/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ६ डिसेंबर, २०२१

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१.०८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.०३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/४/२०१५
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.पुनर्व- २०१८/४००/प्र.क्र.१०६/र-८, दि. २२.११.२०१८
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/६/प्र.क्र.५/र-८, दि.७.३.२०१९
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.पुनर्व-२०१९/५/प्र.क्र.०४/र-८, दि.१९.०९.२०१९
७) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१
८) कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड), जि. सातारा यांचे क्र.ककावि-२/लेशा-४/२१९३/२०२१, दि.२९/०६/२०२१ रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील कामरगाव (एस), कामरगाव (गोकुळ), नहिंबे-मेढेघर, किसरूळे-शिवंदेश्वर व किसरूळे-ढाणकल या पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४,५ व ६ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली असून या कामांना यापूर्वी निधी वितरित करण्यात आलेला नाही. प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या प्रगतीपथावरील या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी निधी मागणी प्रस्ताव कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड), जि.सातारा यांनी संदर्भाधीन क्र. ८ येथील पत्रान्वये सादर केला आहे. प्रकल्प यंत्रणेने सादर केलेल्या सदर प्रस्तावास अनुसरुन प्रस्तावात नमूद प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील कामरगाव (एस), कामरगाव (गोकुळ), नहिंबे-मेढेघर, किसरूळे-शिवंदेश्वर व किसरूळे-ढाणकल या पुनर्वसित गावठाणांमधील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी एकूण रूपये ४१,५७,८९०/- एवढा निधी सन २०२१-२२ या चालू वित्तीय वर्षात वितरीत करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४

परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील कामरगाव (एस), कामरगाव (गोकुळ), नहिंबे-मेढेघर, किसरूळे-शिवंदेश्वर व किसरूळे-ढाणकल या पुनर्वसित गावांमधील खालील विवरणपत्रात नमूद प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये ४१,५७,८९०/- (रुपये एक्केचाळीस लक्ष सत्तावन्न हजार आठशे नव्वद फक्त) "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) (कार्यक्रमावरील खर्च)" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून विभागीय आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे-

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरणासाठी प्रस्तावित रक्कम (रूपये) |
|---|---|---|---|
| १ | कामरगाव (व.स.) | बस थांबा | २,४६,१८१/- |
| २ | कामरगाव (गोकुळ) | बस थांबा | २,४६,१८१/- |
| ३ | नहिंबे-मेढेघर | बस थांबा | २,२१,५५७/- |
| ४ | किसरुळे- शिवंदेश्वर | ग्रामपंचायत कार्यालय इमारत | १६,९५,०५९/- |
| ५ | किसरुळे-ढाणकल | पोहोच रस्ता डांबरीकरण | १७,४८,९१२/- |
| | | **एकूण -** | **४१,५७,८९०/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त,पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता,सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांनी नागरी सुविधा व तदनुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/ मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड), जि. सातारा यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच जिल्हाधिकारी, सातारा यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३११८२१०३७५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2021.12.31 18:25:20 +05'30'

**(संजय जगताप)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणे विभाग, पुणे

२. उप आयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सातारा
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सातारा
५. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
६. कार्यकारी अभियंता,कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड), जि.सातारा
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा
१०.जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
११.वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग,कार्यासन १४७५,मंत्रालय,मुंबई ३२.
१३.महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१४.महसूल व वन विभाग ,पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय,मुंबई ३२.
१५.निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

*****